युवा महोत्सवाचे आयोजनाकरीता निधी मंजूर व वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

### शासन निर्णय क्रमांक :- निवियो-२०२१/प्र.क्र.६७/क्रीयुसे-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ मार्च, २०२२.

वाचा :-

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. युकयो-२०१२/प्र.क्र. ६७/क्रीयुसे-३, दिनांक ०६ जानेवारी, २०१४
२. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१ व दिनांक २९ जुलै, २०२१
३. क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. निधी वितरण/योजना-५५८२/२०२१-२२/का-१०/४२, दि. ०३ जानेवारी, २०२२.

प्रस्तावना :-

महाराष्ट्रातील संस्कृती व परंपरा जतन करण्यासाठी राज्यातील युवांना जिल्हा, विभाग व राज्य स्तरावरील महोत्सवांमध्ये सहभागी होण्याची संधी मिळावी यासाठी संदर्भाधिन क्र. (१) येथील शासन निर्णय, दिनांक ०६ जानेवारी, २०१४ अन्वये राज्यात युवा महोत्सवाचे आयोजन करण्यात येते. तसेच विहित प्रक्रीयेद्वारे निवड झालेला राज्याचा प्रतिनिधी संघ राष्ट्रीय युवा महोत्सवासाठी सहभागी म्हणून पाठविण्यात येतो.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी युवा महोत्सवाचे आयोजन करीता रू. १५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयानुसार सहामाही अखेरीपर्यंत अर्थसंकल्पिय तरतूदीच्या खर्चाची मर्यादा ६० टक्के च्या मर्यादेत आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रू. १५.०० कोटी अर्थसंकल्पित तरतूदीपैकी रू. ८५.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. ३ अन्वये शासनास सादर झाला आहे. त्यानुसार रु. ८५.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

महाराष्ट्रातील संस्कृती व परंपरा जतन करण्यासाठी राज्यातील युवांना जिल्हा, विभाग व राज्य स्तरावरील महोत्सवांमध्ये सहभागी होण्याची संधी मिळावी तसेच विहित प्रक्रीयेद्वारे निवड झालेला राज्याचा प्रतिनिधी संघ राष्ट्रीय युवा महोत्सवासाठी सहभागी म्हणून पाठविण्याकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात

रू. १५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सदर निधी पैकी रू. ८५.०० लक्ष ( अक्षरी रूपये पंच्याऐंशी लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदरहू वितरीत करण्यात येणाऱ्या निधीचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| **अ.क्र.** | **युवा महोत्सव आयोजनाचा स्तर** | **आयोजनाकरीता लागणारा अंदाजित तरतूद** | **वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|---|
| १. | सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित तरतूद | रू. ४५.०० लक्ष | रू. ४५.०० लक्ष |
| २. | सन २०२०-२१ या वर्षातील प्रलंबित तरतूद | रू. २०.०० लक्ष | रू. २०.०० लक्ष |
| ३. | सन २०२१-२२ जिल्हास्तर आयोजन (पंच मानधन, ऑनलाईन प्रक्रियेकरीता आवश्यक असलेला व त्याकरीता सादिल खर्च, इतर आवश्यक व अनिवार्य असलेला अनुषंगीक खर्च.) | प्रति जिल्हा<br>रू. २५,०००×३६ | रू. ९.०० लक्ष |
| ४. | सन २०२१-२२ विभागस्तर आयोजन (पंच मानधन, ऑनलाईन प्रक्रीयेकरीता आवश्यक असलेला व त्याकरीता सादिल खर्च, इतर आवश्यक व अनिवार्य असलेला अनुषंगीक खर्च. ) | **प्रति विभाग**<br>**रू. ५०,०००×८** | रू. ४.०० लक्ष |
| ५. | सन २०२१-२२ राज्यस्तर आयोजन (पंच मानधन, ऑनलाईन प्रक्रीयेकरीता आवश्यक असलेला व त्याकरीता सादिल खर्च, इतर आवश्यक व अनिवार्य असलेला अनुषंगीक खर्च. ) | राज्यस्तर<br>रू. ७.०० लक्ष | रू. ७.०० लक्ष |
| | **एकूण** | **रू. ८५.०० लक्ष** | **रू. ८५.०० लक्ष** |

**(एकूण रुपये पंचाऐंशी लक्ष फक्त)**

२. सदर खर्च "मागणी क्रमांक ई-३, २२२४-क्रीडा व युवक सेवा-१०३, (१०) (१२) युवा धोरणांतर्गत युवक महोत्सवाचे आयोजन ( कार्यक्रम ) ३१ सहाय्यक अनुदाने ( वेतनेत्तर ) या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ च्या

मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, दि. २४.०६.२०२१ व दि. २९.०७.२०२१ मधील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. याकरीता संबंधित विभागीय उपसंचालक/ जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित लेखाशिर्षांतर्गत यावर्षी करण्यांत आलेल्या मंजूर तरतुदीच्या अर्थसंकल्पिय निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही या अटीच्या अधीन राहून, सदर तरतूद वितरित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५६/२०२२/व्यय-५, दि. १५/०२/२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०९१५३१०४३०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.03.09 15:32:16 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
४) मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) मा.राज्य मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
८) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी (संचालनालयामार्फत)
१४) विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, (संचालनालयामार्फत)
१५) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, महाराष्ट्र राज्य ( संचालनालयामार्फत )
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
१७) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) वित्त विभाग-व्यय-५, अर्थसंकल्प-८
१९) नियोजन विभाग-का.१४७१, मंत्रालय, मुंबई
२०) कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) निवड नस्ती, (क्रीयुसे-३).